“गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे " योजनेंतर्गत सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड केलेल्या शेतकरी गटांना सन २०२० - २१ साठी रु.१६.५० कोटी निधी उपलब्ध करुन देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: कृविका-२०१७/प्र.क्र.३२/भाग-१/३-अे**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २४ ऑगस्ट, २०२०

**संदर्भ :** १. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.५.१०.२०१८

२. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.९.९.२०१९

३. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.११.९.२०१९

४. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.१४.०३.२०२०

५. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३ दि.४/५/२०२०

६. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय ,पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.कृ.आ/संचा. आत्मा/गटशेती/अनु.मा./१७०३८/२०२० दि. "निरंक"

**प्रस्तावना :-**

सन, २०२२ पर्यंत शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याच्या केंद्र शासनाच्या दृष्टीकोणास अनुसरुन पीक उत्पादन वाढविण्यासाठी निविष्ठा, प्रशिक्षण, सिंचन, यांत्रिकीकरण, काढणीपश्चात तंत्रज्ञान, कृषिमाल प्रक्रीया व पणन इत्यादी बाबी महत्वाच्या ठरतात. राज्यातील शेतकऱ्यांची जमीनधारणा कमी असल्याने शेतकऱ्यांच्या उत्पादनात भरीव वाढ होण्यासाठी सामुहिक शेती, शेती करण्याची आधुनिक पध्दती व काटेकोर नियोजनाची आवश्यकता ही बाब विचारात घेऊन “गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे” ही योजना राबविण्यास संदर्भाधीन दि. ०५.१०.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत सन २०१७-१८ मध्ये निवड करण्यात आलेल्या १९६ शेतकरी गटांना व सन २०१८-१९ मध्ये निवड करण्यात आलेले २११ शेतकरी गटांना पुढ़ील कामे करण्यासाठी सन २०२०-२१ साठी रु.२६.०० कोटी निधी वितरीत करण्याबाबतची विनंती कृषि आयुक्त कार्यालयाने संदर्भाधीन दि."निरंक" रोजीच्या पत्रान्वये केली आहे.

सन २०२०-२१ करिता “गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे” या योजनेसाठी रु.११० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. कोविड-१९ च्या पार्श्वभूमिवर संदर्भाधीन दि. ०४.५.२०२० च्या शासन निर्णयान्वये मंजूर निधीच्या ३३ टक्केच्या मर्यादेत निधी वितरित करण्याबाबत वित्त विभागाने सुचित केले आहे. तथापि

निधी वितरणासाठी वित्त विभागास सादर केलेल्या सदर नस्तीवर वित्त विभागाने मंजूर निधीच्या १५ टक्के निधी वितरणास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून "गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे " योजनेंतर्गत सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड केलेल्या शेतकरी गटांना सन २०२०-२१ साठी रु. १६.५० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे " योजनेंतर्गत सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड केलेल्या शेतकरी गटांना त्यांच्या प्रकल्प आराखड्यानुसार पुढील कामे करण्यासाठी सन २०२०-२१ साठी रु.१६.५० कोटी (अक्षरी रुपये सोळा कोटी पन्नास लाख फक्त) एवढा निधी आयुक्त ( कृषि ) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे .

२. या वरील खर्च सन २०२०-२१ मध्ये मंजुर झालेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. डी-३**
**२४०१- पीक संवर्धन,**
**१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण ,**
**(०१)माहिती व प्रचार (०१) (५५) गट शेतीस प्रोत्साहन व**
**सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे (१००%**
**राज्य योजना) (२४०१ अे ७८२) योजनांतर्गत ( दत्तमत )**

३. सन २०२०-२१ करीता यापूर्वी वितरीत केलेला निधी व या शासन निर्णयान्वये वितरीत होणारा रु.१६.५० कोटी निधी अखर्चित राहणार नाही याची दक्षता आयुक्त (कृषि) यांनी घ्यावी.

४. सदर योजनेअंतर्गत प्राप्त होणारा निधी खर्ची घालण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी तसेच सहायक संचालक लेखा-१, कृषि आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर योजनेअंतर्गत मानधनाच्या /खर्चाच्या रकमा DBT (Direct Benefit Transfer) द्वारे प्रदान करण्यात याव्यात.

५. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १९३/१४३१ दि. ३०/०७/२०२० तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १३९/२०२०/व्यय-१, दि. ११/०८/२०२० रोजीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००८२४१६२१३४८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.08.28 16:32:53 +05'30'

**( अशोक आत्राम )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
६. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
७. संचालक आत्मा, तथा कृषि नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
८. सर्व संचालक / कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१०.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी तथा प्रकल्प संचालक (आत्मा)
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२.सर्व उपसंचालक, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे कार्यालय
१३.महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई
१४.महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),नागपूर
१५. निवड नस्ती (का.३ अे).